जल जीवन मिशन अंतर्गत सर्वसाधरण (राज्य हिस्सा) घटकाखालील निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करणेबाबत (लेखाशीर्ष २२१५ २०७१)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जजीमी-२०२२/प्र.क्र.७४०/पापु १०**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २४ मार्च,२०२३

वाचा-

१. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि -२०२०/ प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०
२. शासन निर्णय समक्रमांक दि.१३.१२.२०२२
३. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजीमि २०२२/ प्र.क्र.७०२/ पापु १०, दि.०३.०१.२०२३
४. अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I/४०, दि.०९.०१.२०२३
५. शासन निर्णय समक्रमांक दि.०३.०२.२०२३
६. अवर सचिव, पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे आदेश क्र.W-११०२०/१९७/२०१५-Water-I, दि.१६.०३.२०२३

प्रस्तावना-

संदर्भिय क्र.१ दि.०४.०९.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत केंद्र व राज्य वित्तीय आकृतीबंध १:१ आहे. जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षाकरीता सर्वसाधरण घटकांतर्गत (राज्य हिस्सा) लेखाशीर्ष २२१५ २०७१ खाली रु.१९०७.०० कोटी इतका निधी अर्थकल्पित करण्यात आला होता. सन २०२२-२०२३ च्या सुधारीत अंदाजमध्ये सदरची तरतुद रु.१७०७.०० कोटी अशी सुधारीत करण्यात आली आहे.

संदर्भिय क्र.४ दि.०९.०१.२०२३ रोजीच्या आदेशान्वये केंद्र शासनाने जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२-२०२३ च्या प्रथम हप्त्यापोटी रु.१७०१.१०६९ कोटी इतका निधी वितरित केला आहे. त्यामध्ये सर्वसाधरण घटकाखालील रु.९४५.७८८२ कोटी निधीचा समावेश आहे. त्यानुसार जल जीवन मिशन अंतर्गत सर्वसाधारण घटक राज्य हिश्श्याखाली केंद्र हिश्श्याच्या समरुप रु.९४५.७८८२ कोटी इतका निधी (रु.८००.९४ कोटी + रु.८८.७३ कोटी + रु.५६.११८२ कोटी) राज्य पाणी व स्वच्छता मिशनला संदर्भिय क्र.२,३ व ५ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले आहेत.

आता, केंद्र शासनाने संदर्भिय क्र.६ दि.१६.०३.२०२३ रोजीच्या आदेशान्वये सन २०२२-२०२३ वित्तीय वर्षातील प्रथम हप्त्यातील प्रथम भागाचा (1st Tranche of 1st installment) उर्वरित रु.२५६.७०४६ कोटी इतका निधी सर्वसाधारण घटकाखाली राज्य पाणी व स्वच्छता मिशनला ESCROW खात्यात उपलब्ध करुन दिले आहेत. त्यानुसार जल जीवन मिशन अंतर्गत सर्वसाधरण घटकाखाली समरुप राज्य हिश्श्याकरीता रु.२५६.७०४६ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्याची नियोजन विभागामार्फत वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. वित्त विभागाने त्यानुसार रु.२५६.७०४६ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप व संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) उपलब्ध करुन दिला आहे. त्यामुळे जल जीवन मिशन अंतर्गत सर्वसाधारण घटक राज्य हिश्श्याखाली रु.२५६.७०४६ कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२- २०२३ या आर्थिक वर्षामध्ये सर्वसाधारण घटकांतर्गत (राज्य हिस्सा) मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना- जल जीवन अभियान यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली रु.२५६,७०,४६,०००/- (अक्षरी-रु. दोनशे छप्पन्न कोटी सत्तर लक्ष सेहचाळीस हजार फक्त) इतका निधी वित्त विभागाने वितरणास उपलब्ध करुन दिलेला आहे. हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक

अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC०००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी.

३. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.सं.क्र.१३१/व्यय-३ ,दि.२३.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११८१७४४१०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.03.24 19:47:12 +05'30'

**(प्रसाद स्वामी)**
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे येथील राज्य पाणी व स्वच्छता मिशनच्या खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
७. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती- कार्यासन पापु १०